महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर या विद्यापीठाच्या घटक महाविद्यालयातील पशुवैद्यकीय पदवी अभ्यासक्रमाच्या गोवा राज्यातील उमेदवारांकरिता जागा राखीव ठेवण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक मपवि २०२१/ प्र.क्र.८३/म्हापसू**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक - ०५ जानेवारी, २०२२

**वाचा :-**
1) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. मपवि-२०१९/प्र.क्र.३१/माफसू, दि.११/०७/२०१९
2) Directorate of Animal Husbandry and Veterinary Services, Government of Goa, letter no File no 6-2(2)/I/2021-22/4663, dated 05/11/21
3) Secretary, Veterinary Council of India letter no File No.6(1)/2021-VCI/4102-4103, dated 08/11/2021
4) Directorate of Animal Husbandry and Veterinary Services, Government of Goa letter no File no 6-2(2)/I/2021-22/4849, dated 16/11/21
5) Department of Animal Husbandry and Dairying, Ministry of Fisheries, Animal Husbandry and Dairying, Government of India letter no. K-12052-9/47/2021-DADF- Dept. (E19644), Dated 18/11/2021
6) कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ यांचे पत्र क्र मपमविवि / विद्या/ शा.नि./१८९०/२०२१, नागपूर, दिनांक ०६/१२/२०२१

**प्रस्तावना -**

संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णय दि.११ जुलै, २०१९ अन्वये महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठांतर्गत महाविद्यालयातील पशुवैद्यकीय दुग्धतंत्रज्ञान व मत्स्य विज्ञान या अभ्यासक्रमाच्या पदवी, पदव्युत्तर व आचार्य प्रवेशासाठी जागांचे सामाजिक आरक्षण, समांतर आरक्षण, जागाची वाटपाची व प्रवेश प्रक्रीयेची कार्यपध्दती विहीत केलेली आहे. सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद क्र. ७ अ (viii) मध्ये गोवा राज्यातील उमेदवारांकरिता पशुवैद्यकीय पदवी अभ्यासक्रमासाठी मंजूर प्रवेश क्षमतेव्यतिरीक्त जास्तीत जास्त ६ जागा (३ मुंबई व ३ शिरवळ) राखीव ठेवण्यात आलेल्या आहेत.

आता, संदर्भाधीन क्र. २ येथील संचालक, पशुसंवर्धन व पशुचिकित्सा विभाग, पणजी, गोवा यांनी दिनांक ०५ नोव्हेंबर, २०२१ आणि १९ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये **उक्त ६** जागां व्यतिरीक्त ५ जागा (मुंबई-२, शिरवळ-१, परभणी-२) गोवा राज्यातील विद्यार्थ्यांसाठी राखीव ठेवण्याबाबत विनंती केली आहे. त्याअनुषंगाने सचिव, भारतीय चिकित्सा परिषद, नवी दिल्ली यांनी संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक ०८ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये आणि संचालक, पशुसंवर्धन व दुग्ध व्यवसाय विभाग, मत्स्य, पशुसंवर्धन आणि दुग्ध व्यवसाय मंत्रालय,

भारत सरकार यांनी संदर्भाधीन क्र. ५ येथील दिनांक १८/११/२०२१ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाने गोवा राज्यातील विद्यार्थ्यांसाठी महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठामध्ये शैक्षणिक वर्ष सन २०२१-२२ पासून ५ जागा (पशुवैद्यक महाविद्यालय, मुंबई- २, शिरवळ- १, परभणी - २) राखीव ठेवण्याबाबत मान्यता दिलेली आहे. तसेच महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठस्तरीय विद्या परिषदेने संदर्भाधीन क्र. ६ येथील दिनांक ०६/१२/२०२१ रोजीच्या पत्रान्वये गोवा राज्यातील विद्यार्थ्यांसाठी महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठामध्ये शैक्षणिक वर्ष सन २०२१-२२ पासून ५ जागा (पशुवैद्यक महाविद्यालय, मुंबई-२, शिरवळ-१, परभणी-२) राखीव ठेवण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्याची शिफारस केली आहे. त्यानुसार गोवा राज्यातील उमेदवारांकरिता पशुवैद्यकीय पदवी अभ्यासक्रमासाठी राखीव जागेत वाढ करून मंजुर प्रवेश क्षमते व्यतिरिक्त जास्तीत जास्त ११ जागा राखीव ठेवण्याबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

कृषि व पदुम विभागाच्या दिनांक ११ जुलै, २०१९ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ७ अ (viii) मधील तरतूद ऐवजी पुढीलप्रमाणे तरतूद विहित करण्यात येत आहे:-

"महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठातील **पशुवैद्यकीय पदवी अभ्यासक्रमासाठी मंजूर प्रवेश क्षमतेव्यतिरिक्त** गोवा राज्यातील उमेदवारांकरिता **जास्तीत जास्त ११ जागा (महाविद्यालय मुंबई-५, शिरवळ-४, परभणी-२)** राखीव ठेवण्यात याव्यात."

सदर निर्णय महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या कार्यकारी परिषदेच्या मान्यतेच्या अधीनतेने अंमलात येईल.

सदर शासन निर्णय शैक्षणिक वर्ष सन २०२१-२२ पासुन लागू राहील.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashta.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२२०१०५१३१२१२५७०१ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKALA DEVRAM GAVIT

Digitally signed by CHANDRAKALA DEVRAM GAVIT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=db6efff5f9cbf5f55184ebe2b33934e3a1ad06cbfbad22ff0cbcf88f3c89e1e4, pseudonym=6AC1004D14020B1CF4AC873549BD26748DFEB090, serialNumber=B16E6FECB684A6091AF2BD729716C8F32004FE5EF01B9D220C1A6D0EDDC63E52, cn=CHANDRAKALA DEVRAM GAVIT
Date: 2022.01.05 13:13:16 +05'30'

**(चंद्रकला गावित)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई

(२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

(३) मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

(४) मा. मंत्री (पशुसंवर्धन) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

(५) मा. राज्यमंत्री (पदुम) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

(६) मा. मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२

(७) संचालक, पशुसंवर्धन व दुग्ध व्यवसाय विभाग, मत्स्य, पशुसंवर्धन आणि दुग्ध व्यवसाय मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली

(८) सचिव, भारतीय चिकित्सा परिषद, नवी दिल्ली

(९) संचालक, पशुसंवर्धन व पशुचिकित्सा विभाग, पणजी, गोवा

(१०) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे - १

(११) शिक्षण संचालक, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर

(१२) कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर

(१३) नियंत्रक, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर

(१४) प्रधान सचिव (पदुम) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक

(१५) निवड नस्ती (पदुम-२(माफसू))